**माकुनसार खारभूमी योजना, तालुका व जिल्हा पालघर या योजनेस प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः खाभूयो २०१४/(प्र.क्र.८५/२०१४)/खारभूमी**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक:- ०९ ऑगस्ट, २०१८

**पहावे-** मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग,कोंकण प्रदेश,मुंबई यांचे पत्र क्र. धा.क्र.ठा./तां-२(१) / १८६९ दिनांक ०७/०४/२०१४.

**प्रस्तावना:-**

माकुनसार खारभूमी योजना, तालुका व जिल्हा पालघर ही खारभूमी योजना बृहत आराखड्यात समाविष्ट आहे. केंद्रीय वन मंत्रालयाने किनारा नियमन क्षेत्र (CRZ) अधिनियम १९९१ अन्वये या योजनेस सूट दिली आहे. या योजनेची एकूण लांबी ३२५० मी. आहे. सदर योजना मायकोप गावाजवळ दांडा खाडीच्या उपखाडीवर आहे. बांध नसल्याने नियमित भरती- ओहोटी, पूर व अतिवृष्टीमुळे या योजनेच्या लाभक्षेत्रात खारे पाणी येत असल्याने शेतक-यांचे नुकसान होत आहे व त्यामुळे ही योजना होणे गरजेचे आहे. त्याकरिता योजना तातडीने हाती घेण्याबाबत लाभधारक, ग्रामपंचायत व लोकप्रतिनिधींकडून मागणी करण्यात आल्याने मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई यांच्याकडून संदर्भाधीन पत्रान्वये प्राप्त झालेला माकुनसार खारभूमी योजनेस प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुसार सदर प्रस्तावासंदर्भात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

माकुनसार खारभूमी योजना, तालुका व जिल्हा पालघर या योजनेस विभागाच्या सन २०११-१२ व सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सन २०१५-१६ या वर्षाच्या दरसूचीवर आधारित अंदाजित रूपये २१६.०३ लक्ष (रुपये दोनशे सोळा पूर्णांक तीन शतांश लक्ष फक्त) एवढया रक्कमेस याव्दारे प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. कामाकरिता रुपये १९६.३९ लक्ष (रुपये एकशे शहाण्णव पूर्णांक एकोणचाळीस शतांश लक्ष फक्त) व अनुषंगिक कामाकरिता रुपये १९.६४ लक्ष (रुपये एकोणीस पूर्णांक चौसष्ट शतांश लक्ष फक्त) तरतूद असून तरतूदींचा उपशीर्षवार गोषवारा सोबतच्या परिशिष्टामध्ये देण्यात येत आहे. सदरील प्रशासकीय मान्यता पुढील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

१. योजनेच्या कामावरील खर्च मागणी क्रमांक आय-५, मुख्य लेखाशिर्ष "४४०२ मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च (१०२) मृद संधारण (०१) खार जमीन योजना (०१) बांधकामे (योजनांतर्गत) (४४०२०३८४)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा व तो मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

२. जलसंपदा विभाग,शासन निर्णय दिनांक २२.६.२०१५ मधील अनु. क्र.२ व ३ नुसार खारभूमी योजनेचे बांधकाम सुरु करण्यापूर्वी लाभधारकांनी सहकारी संस्था स्थापन करावी व खारभूमी योजना पूर्ण करण्यासाठी पुन:प्रापित क्षेत्रातील लाभधारकांकडून प्रकल्पातील सहभाग म्हणून रुपये ५००/- प्रती हेक्टर खर्च (किमान रुपये २००/- रोख व रुपये ३००/- मजूरीच्या स्वरुपात किंवा रोखीने) घेण्यात यावा. योजनेचे काम पूर्ण झाल्यानंतर योजना देखभाल व दुरुस्तीसाठी त्यांच्याकडे हस्तांतरीत करणे आवश्यक राहील.

३. सदर कामासाठी विहित मार्गाने तरतूद अर्थसंकल्पित केल्याशिवाय त्यावर खर्च केला जाणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

४. या कामाकरीता पर्यावरण विषयक तसेच इतर सर्व वैधानिक मान्यता घेतल्यानंतरच प्रत्यक्ष काम सुरु करावे.

५. सदर प्रशासकीय मान्यता म्हणजे प्रकल्प कार्यान्वयीत करण्याच्या विविध टप्यावर झालेल्या अनियमिततेस मान्यता गृहित धरता येणार नाही. सदर प्रशासकीय मान्यता देणेपूर्वी अथवा नंतरही या कामावर कोणतीही अनियमितता झालेली असल्यास अथवा आढळल्यास सदर प्रशासकीय मान्यता प्रदान केल्याने ती नियमीत झालेली आहे असे गृहीत धरता येणार नाही.

६. या योजनेबाबत चालू असलेल्या अथवा प्रस्तावित विभागीय चौकशीची कार्यवाही पूढे चालू ठेवावी. सदर प्रशासकीय मान्यता देण्याच्या निर्णयामुळे सध्या सुरू असलेल्या अथवा भविष्यात उद्भवणा-या विभागीय चौकशीच्या कार्यवाहीस कोणतीही बाधा पोहचणार नाही.

७. सदर योजनेसाठी कोणत्याही प्रयोजनार्थ मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन, निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च करता येणार नाही. या संदर्भात प्रचलित शासन निर्णय, वित्तीय अधिकार मर्यादा, विहित केलेली निविदा कार्यपद्धती यांचे काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी.

८. सदर प्रकल्पाच्या प्रस्तावित प्रशासकीय मान्यतेमध्ये अंतर्भूत किंमतीला तांत्रिक मान्यता प्राप्त करून घ्यावी.

९. संपूर्ण प्रकल्प हा सदर प्रशासकीय मान्यता किंमतीच्या मर्यादेत पूर्ण करावा.

हा शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-१०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार आंतरवित्त सल्लागार व उप सचिव तसेच नियोजन विभागाच्या (कायार्सन-१४३४) यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १८७/१७, दिनांक ०३/०५/२०१८ नुसार दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

या योजनेस प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता १८४ या अनुक्रमांकावर नोंदविण्यात आली आहे.

सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०८०९१५१६४१५१२७ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

**सहपत्र:**- परिशिष्ट अ

Milind Anand Wani

Digitally signed by Milind Anand Wani
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=811ef2c18db8728b01579fcb3071e86d7af3216659c06a8d34f3d2dda350efea, serialNumber=74547e206b216404acf50aef877b5d61e16ebdf315f88d58c513e53fab55ecf7, cn=Milind Anand Wani
Date: 2018.08.09 15:19:12 +05'30'

**( मि. आ. वाणी )**
शासनाचे अवर सचिव

**प्रतिलिपी :-**

१. मा.मंत्री (खारभूमी विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
३. सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
४. महालेखापाल१/२, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
५. महालेखापाल१/२, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा), मुंबई / नागपूर.
६. मुख्य अभियंता,(दवप्र) व सहसचिव यांचे स्वीय सहाय्यक,जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई.
८. आंतर वित्त सल्लागार व उपसचिव यांचे स्वीय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. उपसचिव (लघु पाटबंधारे) यांचे स्वीय सहाय्यक,जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. प्रकल्प संचालक व अधीक्षक अभियंता, खारभूमी विकास मंडळ, ठाणे.
११. अवर सचिव (खारभूमी), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. अवर सचिव,अर्थ शाखा १/२ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. अवर सचिव, वित्त विभाग/अर्थ-२,मंत्रालय, मुंबई.
१४. खारभूमी कार्यासन, संग्रहार्थ.

(शासन निर्णय जलसंपदा विभाग क्रमांकः खाभूयो २०१४/(प्र. क्र. ८५/२०१४)/ खारभूमी दिनांक ०९/०८/२०१८ चे सहपत्र)

## परिशिष्ट-अ

## माकुनसार खारभूमी योजना, तालुका व जिल्हा पालघरया योजनेच्या प्रशासकीय मान्यता प्रस्तावातील उपशीर्षनिहाय तरतुदी.

(रूपये लक्ष)

| अ.क्र. | उपशिर्ष | एकूण किंमत |
|---|---|---|
| १ | अे-प्राथमिक कामे | ०.०० |
| २ | बी-भूमीसंपादन | ०.०० |
| ३ | सी- मुख्य बांधकाम | १५५.८९ |
| ४ | एफ - उघाडी बांधकाम | ३८.४८ |
| ५ | के - इमारती | ०.०० |
| ६ | एम - वृक्षारोपण | ०.०० |
| ७ | ओ- संकीर्ण | ०.७७ |
| ८ | पी- देखभाल | ०.०० |
| ९ | आर- दळणवळण | १.२५ |
| | **एकूण कामे** | **१९६.३९** |
| | अनुषंगिक खर्च | १९.६४ |
| | **एकूण** | **२१६.०३** |

## ठळक वैशिष्टये

| | |
|---|---|
| पुन:प्रापित होणारे क्षेत्र | ९९ हेक्टर |
| प्रती हेक्टरी किंमत (रुपये) | रुपये २,१८,२१५/- |
| लाभव्यय गुणोत्तर | १.१५ |

Milind Anand Wani

Digitally signed by Milind Anand Wani
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=811ef2c18db8728b01579fcb3071e86d7af3216659c06a8d34f3d2dda350efea, serialNumber=74547e206b216404acf50aef877b5d61e16ebdf315f88d58c513e53fab55ecf7, cn=Milind Anand Wani
Date: 2018.08.09 15:20:25 +05'30'

( मि. आ. वाणी )

शासनाचे अवर सचिव